**"खेलो इंडिया युथ गेम्स" - २०१९**
**आयोजनासाठी उच्चस्तरीय, संनियंत्रण व आयोजन समिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: केआयपी-२३१८/ प्र.क्र. १९७ / क्रीयुसे-१,**
मादाम कामामार्ग , हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार , मुंबई - ४०००३२
दिनांक :- ६ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या दिनांक १६ जुलै, २०१४ च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत योजना "**राजीव गांधी खेल अभियान**" राबविण्यात आली. या कार्यक्रमाखाली सन २०१४-१५ या वर्षामध्ये राज्य शासनातर्फे तालुका, जिल्हा, राज्य, राष्ट्रीय ग्रामीण, महिला व नक्षलग्रस्त भागाकरिता क्रीडा स्पर्धा आयोजन करण्याचा कार्यक्रम राबविण्यात आला. "राजीव गांधी खेल अभियान" या योजनेचे स्वरुप बदलून व केंद्र शासनाच्या युवक कल्याण व क्रीडा मंत्रालयाच्या दिनांक २६/०५/२०१६ च्या परिपत्रकानुसार यापूर्वी केंद्र शासनाद्वारे राबविण्यात येणाऱ्या १. राजीव गांधी खेल अभियान २. अर्बन स्पोर्ट्स इन्फ्रास्ट्रक्चर स्कीम व ३. नॅशनल स्पोर्ट्स टॅलेन्ट सर्च या तीन स्वतंत्र योजनांचे एकत्रिकरण करून "खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम" ही केंद्र पुरस्कृत योजना दिनांक १६/१०/२०१७ च्या परिपत्रकान्वये संपूर्ण देशात लागू केली.

आगामी ऑलिंम्पिक व आशियाई स्पर्धेच्या तयारीच्या दृष्टीने सदर क्रीडा स्पर्धेमधून गुणवंत व उदयोन्मुख खेळाडू निवडून त्यांना तंत्रशुध्द प्रशिक्षण व आर्थिक सहाय्य देणे, खेळाडूंच्या सुप्तगुणांना वाव देणे, खेळासाठी पुरक वातावरण निर्माण करुन सांघिक भावना निर्माण करणे, नेतृत्व गुणांचा विकास करणे तसेच खेळ हे सर्वांगिण विकासासाठी महत्व पुर्ण बाब असून आगामी काळात देश खेळामध्ये महाशक्ती निर्माण व्हावी हा प्रमुख उद्देश ठेवुन खेळातील प्रगतीसाठी योजनाबध्द कार्याची आवश्यकता ओळखुन केंद्राशासनाद्वारे " खेलो इंडिया युथ गेम्स" आयोजित करण्यात येतात.

**शासन निर्णय : -**

शासन सन २०१८-१९ या वर्षातील " खेलो इंडिया युथ गेम्स " स्पर्धांचे आयोजन केंद्र व राज्य शासनाच्या संयुक्त विद्यमाने शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे -बालेवाडी , पुणे येथे साधारण जानेवारी, २०१९ मध्ये करण्यास मान्यता देत आहे.

२. "खेलो इंडिया युथ गेम्स" स्पर्धेकरीता मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य हे प्रमुख आश्रयदाते राहतील. खेलो इंडिया युथ गेम्स २०१९ या स्पर्धेचे आयोजन व संनियंत्रण खालील समित्या गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

i. **उच्चस्तरीय समिती** :- मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण ) यांच्या अध्यक्षतेखालील खालील प्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण ) | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव,वित्त विभाग किंवा त्यांनी नामानिर्देशित केलेले प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेल प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, पर्यटन विभाग किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेल प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | भारतीय खेल प्राधिकरणाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा | सदस्य |
| ८ | श्री. राजू भावसार, खेळाडू प्रतिनधी | सदस्य |
| ९ | श्री. प्रदीप गंधे, खेळाडू प्रतिनिधी | सदस्य |
| १० | श्रीमती अभिलाषा म्हात्रे, खेळाडू प्रतिनधी | सदस्य |
| ११ | श्रीमती कविता राऊत, खेळाडू प्रतिनधी | सदस्य |
| १२ | उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

१) स्पर्धेसाठी आवश्यक आर्थिक निधी उपलब्ध करुन देणे.

२) स्पर्धेचे यशस्वीपणे आयोजन -नियोजन करणे साठी विविध कामांचा आढावा घेणे,

३) स्पर्धेसाठी औद्योगिक प्रतिष्ठाने, कंपनी, खाजगी व्यक्ती यांचेकडून प्रायोजकत्व मिळविण्यासाठी कार्यवाही करणे.

४) उच्चस्तरीय समितीने नेमुन दिलेली कामे संबंधित शासकीय विभाग/स्थानिक स्वराज्य संस्था/शासकीय महामंडळे यांनी पुर्ण केली आहेत त्याचा आढावा घेणे.

५) आयोजन समितीस मार्गदर्शन करणे.

ii.**स्पर्धा सनियंत्रण समिती :-**

विभागीय आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखालील “स्पर्धा सनियंत्रण समिती” गठीत करण्यात येत आहे. उच्चस्तरीय समितीचे निर्णय/आदेश यानुसार संपुर्ण स्पर्धा यशस्वीरितीने पार पाडण्याच्या दृष्टीने सर्व कार्यवाही करावी. या समितीची रचना खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त , पुणे, | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा | सदस्य |
| ३ | आयुक्त, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, | सदस्य |
| ४ | आयुक्त, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, | सदस्य |
| ५ | आयुक्त, महानगरपालिका , पुणे | सदस्य |
| ६ | आयुक्त , महानगरपालिका पिंपरी चिचंवड | सदस्य |
| ७ | पोलिस आयुक्त, पुणे व पिंपरी चिंचवड | सदस्य |
| ८ | उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९ | उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १० | जिल्हाधिकारी, पुणे | सदस्य |
| ११ | अधिष्ठाता, बी.जे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे | सदस्य |
| १२ | कुलसचिव, सावित्रीबाई फुले, पुणे विद्यापीठ | सदस्य |
| १३ | मुख्य अभिंयता सा.बां. विभाग, पुणे | सदस्य |
| १४ | प्रादेशिक परिवहन अधिकारी, पुणे. | सदस्य |
| १५ | सहाय्यक संचालक, अन्न व औषध प्रशासन | सदस्य |
| १६ | क्रीडा संचालक, सावित्रीबाई फुले, पुणे विद्यापीठ | सदस्य |
| १७ | विभागीय उपसंचालक, माहिती व जनसंपर्क | सदस्य |
| १८ | विभागीय उपसंचालक, महाराष्ट्र पर्यटन मंडळ | सदस्य |
| १९ | श्री. कमलेश मेहता, खेळाडू प्रतिनीधी | सदस्य |
| २० | श्री. मनोज पिंगळे, खेळाडू प्रतिनधी | सदस्य |
| २१ | श्रीमती तेजस्वीनी सावंत, खेळाडू प्रतिनीधी | सदस्य |
| १९ | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा | सदस्य सचिव |

**समितीच्या कार्यकक्षा :-**

१) शासनाकडून आर्थिक अनुदान मिळणेसाठी समन्वय करणे.

२) स्पर्धा आयोजन करण्यासाठी विविध कामांचे नियोजन करणे .

३) स्पर्धा आयोजनासाठी सुविधा तयार करण्यासाठी सर्व प्रकारचे सहाय्य करणे.

४) स्थानिक स्तरावर प्रायोजकत्व मिळविण्यासाठी सहाय्य करणे.

५) या स्पर्धाच्या आयोजनासाठी महानगरपालिका, विविध शासकीय विभाग, संस्था, यांचे कडील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन स्पर्धा संयोजनकामी घेणे.

६) प्रेक्षकांची व शालेय विद्यार्थ्यांची स्पर्धा स्थळी व्यवस्था करण्यासाठी नियोजन व मार्गदर्शन करणे.

iii. **स्पर्धा आयोजन समिती :-** खेलो इंडिया युथ गेम्स साठी आयोजन समिती उपसचिव , शालेय शिक्षण व क्रीडा यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात येत आहे. या समितीची रचना खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा | अध्यक्ष |
| २ | उपसंचालक, क्रीडा वयुवक सेवा, संचालनालय (मुख्यालय) | सदस्य |
| ३ | उपसंचालक, शिवछत्रपती क्रीडापीठ, महाळुंगे-बालेवाडी, पुणे | सदस्य |
| ४ | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय (मुख्यालय) | सदस्य |
| ५. | सह संचालक, लेखा व कोषागार पुणे | सदस्य |
| ६. | सह संचालक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |
| ७ | लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय | सदस्य |
| ८ | तांत्रिक सल्लागार, अध्यक्ष यांच्या संहमतीने | सदस्य |
| ९ | सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय | सदस्य |
| १०. | सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय | सदस्य |
| ११. | श्री. का.का. पवार, खेळाडू प्रतिनीधी | सदस्य |
| १२ | श्रीमती अंजली भागवत, खेळाडू प्रतिनीधी | सदस्य |
| १३ | श्रीमती ललिता बाबर, खेळाडू प्रतिनीधी | सदस्य |
| १४. | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय | सदस्य सचिव |

**समितीच्या कार्यकक्षा :-**

१) उच्चस्तरीय समिती व आयोजन समिती यांचेशी समन्वय करुन स्पर्धा संपन्न करणे.

२) केंद्र शासन क्रीडा विभाग व भारतीय क्रीडा प्राधिकरण यांचेशी समन्वय करुन स्पर्धा कार्यक्रम निश्चित करणे ,

३) स्पर्धेचे अंदाजपत्रक तयार करणे ,

४) शासनाकडून स्पर्धेसाठी आर्थिक निधी उपलब्ध करुन घेणे व खर्च करणे.

५) खेळाचे प्रत्यक्ष आयोजन करण्यासाठी खेळाडू , मार्गदर्शक, तांत्रिक अधिकारी, स्वयंसेवक, सुरक्षारक्षक यांची निवास व्यवस्था, भोजन, वाहतूक व्यवस्था इ. करणे

६) स्पर्धा आयोजनासाठी वेळोवेळी लागणारे साहित्य, स्टेशनरी, संगणक, प्रिटिंग तसेच तात्पुरत्या स्वरुपात घ्यावयाच्या भाडोत्री सेवा उपलब्ध करुन देणे

७) विविध स्पर्धा अनुषंगिक बाबत निविदा मागविणे, अंतिम करणे, निविदाकारांशी वाटाघाटी करुन दर निश्चित करणे ,करार करणे, कार्यारंभ आदेश देणे, तपासणी करणे, दंड लावणे, देयक अदा करणे, देयक कपात करणे, अथवा नाकारणे, खर्चाचे लेखापरिक्षण करणे, खर्च करावा किंवा नाही याबाबत अंतिम निर्णय घेणे तसेच करार करणे

८) खेलो इंडिया युथ गेम्स, २०१९ या स्पर्धेचे आयोजन प्रामुख्याने शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे,बालेवाडी , पुणे संकुलातील विविध खेळांच्या सुविधांची दुरुस्ती /नुतनीकरण करणे

९) आयोजन समितीने शासकीय नियमांचे पालन करुन विहित पध्दतीचा अवलंब करुन महाराष्ट्र शासन/भारतीय खेल प्राधिकरण अथवा केंद्र शासनाने यासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधी मधून खर्च करावा.

१०) स्पर्धा आयोजन दरम्यान तातडीचे खर्च मंजूर करणे

११) शासनाकडून प्राप्त अनुदान आवश्यकतेनुसार अन्य बाबीवर करणे अनिवार्य असल्यास त्यास मान्यता देणे,

१२) स्पर्धा सुरळीत पार पाडण्यासाठी विविध उपसमित्यांचे गठण करणे,

१३) स्पर्धा आयोजन समितीचे नावे राष्ट्रकृत बँकेत खाते उघडणे व खात्याचे कार्यान्वय करणे व त्यामधून नियमानुसार स्पर्धेसाठी आवश्यक तो खर्च करणे व हिशोब ठेवणे.

१४) स्पर्धेच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या प्रसंगानुरुप उचित निर्णय घेणे व त्याची अंमलबजावणी करणे.

३. “ खेलो इंडिया युथ गेम्स ” स्पर्धेचे आयोजन नियोजनबद्ध होण्याच्या दृष्टीने आयोजन समितीने भारतीय खेल प्राधिकरण/ केंद्रशासनाने स्विकारलेल्या जबाबदाऱ्या खेलो इंडिया बाबत काम पाहणाऱ्या भारतीय खेल प्राधिकरण व केंद्र शासनाच्या अधिकाऱ्यांशी समन्वय करुन पार पाडाव्यात .

४. सदर स्पर्धेचे आयोजन हे प्रामुख्याने शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे,बालेवाडी , पुणे येथे करण्यात येत असल्याने सदर संपूर्ण संकुलातील विविध खेळांच्या सुविधांची दुरुस्ती /नुतनीकरण करणे या कामी स्पर्धा आयोजन समितीने शासकीय नियमांचे पालन करुन विहित पध्दतीचा अवलंब करुन शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधी मधून खर्च करावा हा खर्च आयोजन समितीने उपलब्ध निधीतून नियमानुसार करावा. ज्या सुविधा या क्रीडा संकुलात उपलब्ध नाहीत त्या खरेदी करणे अथवा भाडे तत्वावर घेणे याबाबतचा अधिकार आयोजन समितीस राहील.

५. स्पर्धा आयोजनाच्या अनुषंगाने विविध बाबींवर येणारा खर्च हा खेलो इंडिया युथ गेम्स, २०१९ साठी महाराष्ट्र शासन, भारतीय खेल प्राधिकरण अथवा केंद्रशासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून विविध पध्दतीचा व नियमांचा अवलंब करुन आयोजन समितीने करावा. यासंदर्भातील सर्व अधिकार आयोजन समितीला प्रदान करण्यात येत आहेत.

६. विविध स्पर्धा आयोजनाच्या दृष्टीने अनुषंगिक बाबींबाबत निविदा मागविणे, अंतिम करणे, करारनामा करणे, कार्यारंभ आदेश देणे, तपासणी करणे, दंड लावणे, देयक अदा करणे, देयक कपात करणे, अथवा नाकारणे, खर्चाचे लेखापरिक्षण करणे, खर्च करावा किंवा नाही याबाबत अंतिम निर्णय घेणे तसेच करार करणे इ. याबाबतचे अधिकार आयोजन समितीस राहतील.

७. **बँक खात्याचे कार्यान्वयन :-** खेलो इंडिया युथ गेम्स साठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त होणारे अनुदान तसेच प्रायोजकांकडून मिळणारे आर्थिक सहाय्य शिवछत्रपती क्रीडापीठाच्या खात्यात जमा करण्यात यावे. सदर रकमा स्पर्धा आयोजन समितीच्या मान्यतेने खर्च कराव्यात. मात्र खेलो इंडीया युथ गेमसाठी केलेल्या खर्चाचा हिशोब स्वतंत्र ठेवण्यात यावा.

८. खेलो इंडिया युथ गेम्स, २०१९ स्पर्धेचे आयोजन संपन्न झालेनंतर सदर खात्याचे लेखापरिक्षण खाजगी सनदी लेखापाल यांचेकडून करण्यात यावे. ही जबाबदारी आयोजन समितीची राहील.

९. केंद्रशासनाचे व भारतीय खेल प्राधिकरण नामनिर्देशीत अधिकारी पुणे येथे राहणे आवश्यक राहील. आयुक्त क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी त्यांच्या अधीनस्त त्यांना आवश्यक असतील त्या अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा आवश्यकते प्रमाणे अधिग्रहित कराव्यात.

१०. वरील समित्यांचा कालावधी ६ महिन्याकरीता राहील.

११.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांच्या संकेतांक २०१८१००६१७५६०८७३२१ आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.06 17:59:00 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

२. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अ.मु.स./ प्रधान सचिव/ सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग/ वित्त विभाग/ नियोजन विभाग/ पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
८. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
९. आयुक्त, ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पुणे.
१२. पोलिस आयुक्त, पुणे.
१३.सर्व जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
१५. प्रादेशिक संचालक, भारतीय खेल प्राधिकरण (SAI), मुंबई
१६. कुलगुरु, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
१७. अधिष्ठाता, बी.जे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ससून सर्वोपचार रुग्णाला, पुणे.
१८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
१९. प्रादेशिक परिवहन अधिकारी, पुणे
२०. सहाय्यक संचालक, अन्न व औषध प्रशासन,
२१.क्रीडा संचालक, सावित्रीबाई फले पुणे विद्यापीठ,
२२.विभागीय उपसंचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, पुणे
२३. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
२४. सर्व समिती सदस्य. ( आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचेमार्फत )
२५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
२६. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
२७. नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
२८. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
२९.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
३०.कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. निवडनस्ती, क्रीयुसे-१.